**कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावत असताना कोरोना विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू पावलेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटूंबियांना विमा कवच / सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याबाबत.**

**कै. (श्री.) सैय्यद आरीफ सैय्यद हनिफ, प्रयोगशाळा परिचर**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक : सहाय्य-२०२४/प्र.क्र.३०/टीएनटी-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२
दिनांक : २६ ऑगस्ट, २०२४

संदर्भ :-

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२०, दिनांक. १४.१०.२०२० व दिनांक १४.०५.२०२१
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचे क्रमांक: सहाय्य-२०२०/प्र.क्र.८१/टीएनटी-६, दिनांक ०७.१२.२०२० व दिनांक १६.०३.२०२१ चे पत्र.
३) शिक्षण उपसंचालक, अमरावती विभाग, अमरावती यांचे पत्र क्र.डीसीपीएस/विमा कवच/कोव्हिड-१९.सहाय/वित्त/क/६९२/२०२४, दि. १९ जानेवारी, २०२४
४) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), शिक्षण संचालनालय, पुणे यांचे कार्यालय पत्र क्र.शिसंमा/२०२३/टि-७/कोव्हिड-१९/विमाकवच/सहाय्य/सैय्यद आरीफ/१३५५, दि. १२/०३/२०२४
५) तालुका आरोग्य अधिकारी, तालुका आरोग्य अधिकारी कार्यालय, अंजनगाव सुर्जी, जिल्हा अमरावती यांचे पत्र क्र. ताआअ/पत्र/४२९/२०२२, दि.०५/१२/२०२२

ज्ञापन :-

कै. (श्री.) सैय्यद आरीफ सैय्यद हनिफ, प्रयोगशाळा परिचर, हैदरिया उर्दु हायस्कूल कापूसतळणी ता.अंजनगाव सुर्जी जि.अमरावती यांचा कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावताना कोव्हिड-१९ मुळे दिनांक २१/०६/२०२१ रोजी मृत्यू झालेला आहे.

२. कै. (श्री.) सैय्यद आरीफ, यांच्या वारसास वित्त विभागाच्या संदर्भ क्र. (१) येथील दिनांक २९.०५.२०२० च्या शासन निर्णयानुसार रु.५०.०० लक्ष रकमेचे सानुग्रह सहाय्य देण्याबाबतचा प्रस्ताव शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) शिक्षण संचालनालय, पुणे यांनी संदर्भ क्र. (४) येथील पत्रान्वये शिफारसीसह सादर केला आहे.

३. कै. (श्री.) सैय्यद आरीफ यांची ग्रामपंचायत कार्यालय, कापुसतळणी, ता. अंजनगाव सुर्जी जि. अमरावती येथे दि.०१/०६/२०२१ च्या पत्रान्वये कोरोना विषाणुच्या साथीच्या अनुषंगाने प्रतिबंधात्मक मदतकार्याकरिता ग्राम दक्षता समितीच्या निर्देशानुसार नियुक्ती करण्यात आली होती. सदर नियुक्ती जिल्हाधिकारी, अमरावती यांच्या दिनांक १७/०५/२०२० च्या आदेशान्वये दिलेल्या निर्देशाच्या अनुषंगाने करण्यात आलेली होती व कै.(श्री.) सैय्यद आरीफ हे दिनांक ०१/०६/२०२१ ते दि.१२/०६/२०२१ पर्यंत कोव्हीड प्रतिबंधक कार्यात कर्तव्य बजावण्याकरिता लसीकरण केंद्र कापुसतळणी येथे कर्तव्यावर हजर असल्याबाबत गट विकास अधिकारी, अंजनगाव सुर्जी यांनी आणि संदर्भ क्र.५ अन्वये तालुका आरोग्य अधिकारी कार्यालय, अंजनगाव सुर्जी, जिल्हा अमरावती यांनी प्रमाणपत्र सादर केले आहे.

४. कै. (श्री.) सैय्यद आरीफ यांना दि.१२/०६/२०२१ ते दि.२१/०६/२०२१ या कालावधीत दी बेस्ट हॉस्पीटल कोव्हिड केअर, अमरावती येथे उपचार करण्यात आले. दिनांक २१/०६/२०२१ रोजी कै. (श्री.) सैय्यद आरीफ यांचा कोव्हिड-१९ लागण होऊन मृत्यु झाल्याचे वैद्यकीय प्रमाणपत्र फॉर्म क्र. ४ द्वारे वैद्यकीय अधिक्षक, दी बेस्ट हॉस्पीटल कोव्हिड केअर, अमरावती यांनी प्रमाणित केले आहे

५. तहसिलदार, तहसिल कार्यालय, अंजनगाव सुर्जी यांनी कै. (श्री.) सैय्यद आरीफ हे कोरोना काळामध्ये (कोव्हिड-१९) कर्तव्यावर हजर होते व कोरोना प्रतिबंधात्मक उपाययोजनेसाठी दवाखान्यात दाखल होण्याअगोदर आणि मृत्युच्या १४ दिवस अगोदर कर्तव्यावर हजर असल्याबाबत प्रमाणित केले आहे.

६. कै. (श्री.) सैय्यद आरीफ यांचा दिनांक २१/०६/२०२१ रोजी मृत्यु झाल्याबाबत निबंधक, (जन्म, मृत्यु) ग्रामपंचायत, खालापूर यांनी मृत्यु प्रमाणपत्र सादर केले आहे.

७. मा. दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर, अंजनगाव सुर्जी यांनी कै. (श्री.) सैय्यद आरीफ यांचे कायदेशीर वारस म्हणून (१) खातून बी.सै. आरीफ (पत्नी) (२) श्रीमती लैबा साहेर सैय्यद आरीफ (मुलगी) (३) श्रीमती अरीबा कौसर सैय्यद आरीफ (मुलगी) (४) श्री.सैय्यद उमेर इझान सैय्यद आरीफ (मुलगा) (५) श्री. सैय्यद साद सैय्यद आरीफ यांना घोषित केले आहे

८. कै. (श्री.) सैय्यद आरीफ सैय्यद हनिफ यांना २२०२-०४४२ या लेखशिर्षातून मासिक वेतन अदा करण्यात येत असल्याचे शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, अमरावती यांनी प्रमाणित केले आहे.

९. तहसिलदार, तहसिल कार्यालय, अंजनगाव सुर्जी व वैद्यकीय अधिक्षक, दी बेस्ट हॉस्पीटल कोव्हिड केअर, अमरावती यांनी प्रमाणित केल्यानुसार तसेच, मा. दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर,

अंजनगाव सुर्जी यांनी कै. (श्री.) सैय्यद आरीफ सैय्यद हनिफ यांचे कायदेशीर वारस म्हणून (१) खातून बी सैय्यद आरीफ (पत्नी) (२) श्रीमती लैबा साहेर सैय्यद आरीफ (मुलगी) (३) श्रीमती अरीबा कौसर सैय्यद आरीफ (मुलगी) (४) श्री.सैय्यद उमेर इझान सैय्यद आरीफ (मुलगा) (५) श्री. सैय्यद साद सैय्यद आरीफ यांना घोषित केल्यानुसार यांना एकत्रित रु.५० लक्ष (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रकमेचे सर्वकष वैयक्तिक अपघात विमा कवच /सानुग्रह सहाय्य प्रदान करण्यास वित्त विभागाच्या दिनांक २९/०५/२०२० च्या शासन निर्णयानुसार याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

१०. प्रस्तुत प्रस्तावावरील खर्च वित्त विभागाच्या अभिप्रायानुसार अनौपचारिक संदर्भ क्र.६७३/व्यय-५, दिनांक ०५/०८/२०२४ अन्वये खाली नमूद लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

"मागणी क्रमांक ई-२, (००)(०१) सर्वसाधारण शाळांना सहायक अनुदान
अनिवार्य (२२०२ ०४४२), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)."

११. सदर निधी वितरित करण्यासाठी आयुक्त (शिक्षण), पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

१२. सदर शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२४०८२६१८३४५९५५२१ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2024.08.26 18:49:56 +05'30'

**(तुषार महाजन)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीकरीता :-**

१. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
३. शिक्षण उपसंचालक, अमरावती विभाग, अमरावती
४. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
५. अधिक्षक, वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक, (माध्यमिक व उच्च माध्यमिक), अमरावती
६. शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, अमरावती

**प्रत माहितीसाठी :-**

१. वित्त विभाग (व्यय ९)/(व्यय ५), मंत्रालय, मुंबई

२. कक्ष अधिकारी/अवर सचिव (एस एम ४)/अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

३. श्रीमती खातून बी सैय्यद आरीफ, वॉर्ड नं.१, काजी पुरा, खालापूर, अमरावती-४४४ ८०२

४. निवड नस्ती (टीएनटी-६)(प्र.क्र. ३०/२०२४)